**मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०२०-२१ करिता पहिला हप्ता अनुदान रु. १२.०० कोटी रक्कम वितरित करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- मुअप्र-२०२०/प्र.क्र.१३१/९-अे,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ११ ऑगस्ट, २०२०

संदर्भ:-

१. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. राअअ-१११६/प्रक्र२४८/१४अे,दि.२० जून, २०१७
२. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. कृप्रधो-२०१७/प्रक्र२०८/९अे, दि. ३१ ऑक्टोबर, २०१७
३. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. कृराधो-१४१७/प्रक्र१०९/९अे, दि. ६ जून. २०१८
४. शासन निर्णय. वित्त विभाग क्र.अर्थसं.-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०
५. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. मुअप्र-२०२०/प्र.क्र.१३१/९अे, दि. २९ जून. २०२०

प्रस्तावना:-

राज्यातील अन्नप्रक्रिया उद्योगाला चालना देणे, शेतीमालाचे मूल्यवर्धन करणे करिता शेतकऱ्यांचे सहभागाद्वारे आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित प्रकल्प स्थापित करण्यास प्रोत्साहन देणे, उत्पादित अन्न पदार्थाच्या गुणवतेमध्ये वाढ व्हावी, उर्जेची बचत व्हावी यासाठीच्या प्रकल्पाच्या आधुनिकीकरणास प्रोत्साहन देणे या अधिष्ठांसह उपरोक्त वाचा येथील क्रमांक १ च्या शासन निर्ययान्वये राज्यामध्ये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून पुढील पाच वर्षासाठी **मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना** ही १००% राज्य पुरस्कृत योजना सुरु करण्यात आली आहे. तसेच संदंभ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये राज्याचे अन्न प्रक्रिया धोरण - २०१७ जाहीर करण्यात आले असून संदंभ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये राज्यामध्ये अन्न प्रक्रिया योजनेअंतर्गत लघु, सुक्ष्म व मध्यम उद्योगांसाठी क्षेत्र मर्यादा विहित करण्यात आली आहे. संदंभ क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ मध्ये अर्थसंकल्पीय तरतुदीच्या ३३ % च्या मर्यादेत सदर योजेची अंमलबजावणी करण्यासाठी प्रशाकीय मान्यता देण्यात आली आहे. आता सदरहू योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी निधी वितरणाची बाब विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय:-

१. राज्यात मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजनेची सन २०२०-२१ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी सन २०२०-२१ मध्ये अर्थसंकल्पित तरतूदीच्या ३३ % मर्यादेत प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून अर्थसंकल्पित तरतूदीच्या २०% म्हणजे सन २०२०-२१ साठी अर्थसंकल्पित केलेल्या रुपये ६०.०० कोटी रक्कमेपैकी रुपये १२.०० कोटी (रुपये बारा कोटी फक्त) एवढा निधी वितरणास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.
**मागणी क्रमांक डी-३,**
**२४०१- पिक संवर्धन**
**(००) (१०२) अन्नधान्य पिके,**
**(००) (३४) मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना (१००% राज्य योजना)**
**(२४०१ A ७९१)**
**३३, अर्थसहाय्य**

३. चालू वर्षी या योजनेंतर्गत निधी उपलब्ध करुन दिल्यानंतर तो प्रथमत: सन २०१८-१९ व सन २०१९-२० या वर्षातील प्रलंबित प्रकरणांसाठी वापरण्यात यावा. प्रलंबित प्रकरणे निकाली निघाल्यानंतर आणखी निधीची आवश्यकता असल्यास तसा निधीबाबतचा स्वयंस्पष्ट प्रस्ताव स्वतंत्रपणे शासनास सादर करावा. नवीन दायित्व निर्माण करु नये.

४. संदर्भांकित शासन निर्णय दि. २०/०६/२०१७ अन्वये विहित केलेल्या तरतुदींनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी व त्यानुषंगाने योजना सन २०२०-२१ मध्ये राबविण्याकरिता मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालय स्तरावरून निर्गमित कराव्यात.

५. सदर योजना सन २०२०-२१ मध्ये राबविण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तर सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. राज्य शासनाने विहित केलेले नियम/सूचनांचे पालन करून लेखापरीक्षण करून निधी वितरणाचे उपयोगिता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर करावे.

७. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्तीचे तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११५/२०२०/व्यय-१, दिनांक १७.०७.२०२० अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००८१०१७३८१२६४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.08.11 13:19:58 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३. मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा. विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९. मा. मुख्य सचिव यांचे स्विय सहाय्यक.
१०.सचिव (कृषि) यांचे स्विय सहाय्यक. कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२.संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३.सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१४.सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१५.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर.
१७.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१८.संचालक, लेखा व कोषागारे अधिकारी, मुंबई (२ प्रती).
१९.सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
२०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२१.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२२.कक्ष अधिकारी (का.१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३.कक्ष अधिकारी (अर्थ.-१३/व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४.कक्ष अधिकारी (२-अे),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२५.निवड नसती - ९अे.